**औरंगाबाद येथील उस्मानपूरा वनवसाहत येथे उपवनसंरक्षक (वन्यजीव), औरंगाबाद यांचे विभागीय कार्यालयीन इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१४/प्र.क्र.९८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २६ ऑक्टोबर, २०१६

वाचा :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/३१३/२०१५-१६, दिनांक १२.३.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

औरंगाबाद येथील वनखात्याची सर्व कार्यालये एकाच इमारतीमध्ये असावयाच्या दृष्टीकोनातून संयुक्त इमारत बांधकामाच्या रू. १३२८.१० लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २१.९.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत औरंगाबाद येथील वनखात्याची सर्व कार्यालये एकाच इमारतीमध्ये असावयाचे दृष्टीकोनातून संयुक्त इमारत बांधकाम करणेकरिता सचिव समितीने रू.११७३.७८ लक्ष एवढया किंमतीच्या अंदाजपत्रक प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सहमती दर्शविलेली आहे.

त्यानुषंगाने, औरंगाबाद येथील वनखात्याची सर्व कार्यालये एकाच इमारतीमध्ये असावयाचे दृष्टीकोनातून संयुक्त इमारत बांधकाम करणेकरिता सचिव समितीने सदर प्रस्तावाच्या रू.११७३.७८ लक्ष अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने नमुद केलेल्या अटीच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे :-

अ) काम सुरु करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

ब) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१ दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

क) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करुनच काम हाती घ्यावे.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय

अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२६१२४८०७३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2016.10.26 12:51:38 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक
५. उपवनसंरक्षक (वन्यजीव), औरंगाबाद.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०.फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.(निवडनस्ती).